**राज्यातील जिल्हा परिषदेमार्फत चालविल्या जाणाऱ्या उच्च माध्यमिक शिक्षकांना शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक २६.२.२०१४ च्या शासन निर्णयातील वेतनश्रेणी लागू करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः डिएसआर २०१५/प्र.क्र.५३/आस्था.५,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
तारीख : ०६ एप्रिल, २०१७.

वाचा -

१) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय क्रमांक. एचएससी १३००/(२८०३/२०००)/उमाशि-१, दिनांक ३ जून, २०००
२) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक. डिएसआर २००१/प्र.क्र.२९/आस्था.५, दिनांक ११ नोव्हेंबर, २००५.
३) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय क्रमांक. वेतन २०१४/प्र.क्र.२/१४/टिएनटी-३, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१४.

**शासन निर्णय:**

राज्य शासनाच्या उच्च माध्यमिक / कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांना शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने दिनांक ३.६.२००० च्या शासन निर्णयान्वये प्रथमश्रेणी ७२२५-२२५-११०५०, वरिष्ठश्रेणी ८०००-२७५-१३५०० व निवडश्रेणी ९१२५-२७५-१४०७५ ही सुधारित त्रिस्तरीय वेतनश्रेणी दिनांक १ मार्च, २००० पासून लागू केली. त्याच धर्तीवर राज्यातील जिल्हा परिषदेमार्फत चालविल्या जाणाऱ्या उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षक / कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांना ग्रामविकास व जलसंधारण विभागाने दिनांक ११.११.२००५ च्या शासन निर्णयान्वये सुधारित त्रिस्तरीय वेतनश्रेणी दिनांक १.३.२००० पासून लागू केली.

त्यानंतर राज्यातील उच्च माध्यमिक शाळा / कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांना दिनांक ३.६.२००० च्या शासन निर्णयान्वये लागू करण्यात आलेली सुधारित त्रिस्तरीय वेतनश्रेणी दिनांक १.१.१९९६ पासून लागू करण्याचा तसेच त्याचा प्रत्यक्ष लाभ दिनांक १.४.२०१४ पासून देण्याचा निर्णय शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने त्यांच्या दिनांक २६.२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये घेतला.

राज्यातील जिल्हा परिषदेच्या उच्च माध्यमिक शिक्षक / कनिष्ठ महाविद्यालयीन शिक्षकांना शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक २६.२.२०१४ च्या शासन निर्णयातील अटी / शर्ती लागू करुन सुधारित वेतनश्रेणीचा लाभ दिनांक १.३.२००० ऐवजी दिनांक १.१.१९९६ पासून काल्पनिक वेतनवाढ देऊन त्याचा प्रत्यक्ष लाभ दिनांक १.४.२०१४ पासून लागू करण्यास, त्यांना कोणत्याही परिस्थितीत थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही, या अटीच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

या प्रयोजनासाठी लागणारी आर्थिक तरतूद शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने करावी.

हे आदेश शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४/१६/टीएनटी-३, दिनांक ७.१.२०१७ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भक्र. १२१/२०१७/व्यय-१५, दिनांक १०.३.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०६१५४२१७३६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Narayan Bhandarkar

Digitally signed by Sandesh Narayan Bhandarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Narayan Bhandarkar
Date: 2017.04.06 16:32:13 +05'30'

( सं. ना. भंडारकर )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत माहिती व उचित कार्यवाहीसाठी सादर

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. वित्त विभाग (व्यय-१५), (सेवा-९), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८. सर्व विभागीय आयुक्त.
९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१०.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
११.सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी (माध्यमिक).
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.
१४.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व).
१६.जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व).
१७.संचालक, माहिती व जनसंपर्क यांना योग्य त्या प्रसिध्दीसाठी
१८. ग्रामविकास व जलसंधारण विभागातील कार्यासन क्र. आस्था.७, आस्था.८, आस्था.९, आस्था.१०, आस्था.१२, आस्था.१४, संगणक कक्ष.
१९.निवडनस्ती , कार्यासन आस्था.५